सामान्य राज्यसेवा गट-ब व वैद्यकीय अधिकारी गट-ब (वेतनस्तर एस-१६) संवर्गातील अधिकाऱ्यांच्या पदस्थापना/बदली याबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारस करण्यासाठी नागरी सेवा मंडळ स्थापन करणेबाबत...

## महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग

**शासन निर्णय क्रमांकः** संआसे-२०२३/प्र.क्र.१७७/सेवा-१
१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत,
मंत्रालय, मुंबई-४०० ००१.
तारीखः  ०९ जून, २०२३

**वाचा :-**

१) शासन निर्णय क्रमांकः सा.प्र.वि. एसआरव्ही-२०१४/प्र.क्र. २६/१२, दि. ३१.०१.२०१४
२) शासन निर्णय क्रमांकः सा.आ.वि.,एसआरव्ही-१०१६/प्र.क्र. ३२५/सेवा-२, दि. ०३.०४.२०१४
३) शासन निर्णय क्रमांकः सा.आ.वि.,एसआरव्ही- १०१६/प्र.क्र. ३२५/सेवा-२, दि. १७.०४.२०१७
४) शासन अधिसुचना क्रमांक: संआसे-२०२३/प्र.क्र.१७७/सेवा-१, दि.०९.०६.२०२३

**प्रस्तावना :-**

मा. सर्वोच्च न्यायालय यांनी रिट पिटीशन (सिव्हील) क्र.८२/२०११ मध्ये दिनांक ३१.१०.२०१३ रोजी दिलेल्या न्यायनिर्णयानुसार, शासन सेवेतील गट-अ, गट-ब व गट-क मधील अधिकारी/कर्मचा-यांच्या पदस्थापना व बदली याबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारसी करण्यासाठी, दिनांक ३१.०१.२०१४ च्या शासन निर्णयान्वये दिलेल्या निर्देशास अनुसरून, संदर्भाधीन क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ, गट-ब (राजपत्रित व सामान्य राज्य सेवा गट-अ, गट-ब (राजपत्रित) संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदली / पदस्थापना याबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारसी करण्यासाठी नागरी सेवा मंडळ (१) ची स्थापना करण्यात आली आहे.वाचा क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये सामान्य राज्य सेवा गट-ब व वैद्यकीय अधिकारी गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांच्या सरळसेवेने/पदोन्नतीने पदस्थापना तसेच बदली याबाबत सक्षम प्राधिका-यास शिफारशी करण्यासाठी संदर्भाधिन क्र. २ येथील शासन निर्णयान्वये स्थापन करण्यात आलेल्या नागरी सेवा मंडळ

(१) मध्ये सुधारणा करण्यात आली आहे. आता, संदर्भ क्र. ४ येथील अधिसूचनेन्वये मा. मंत्री, सार्वजनिक आरोग्य यांना प्रदान करण्यात आलेले सर्वसाधारण बदल्यांचे अधिकार (सामान्य राज्यसेवा गट-ब व वैद्यकीय अधिकारी गट-ब) आयुक्त, आरोग्य सेवा मुंबई यांना प्रत्यार्पित करण्यात आलेले आहेत. याअनुषंगाने सामान्य राज्यसेवा गट-ब व वैद्यकीय अधिकारी गट-ब (वेतनस्तर एस-१६) या संवर्गातील अधिका-यांच्या बदलीबाबत सक्षम प्राधिका-यास शिफारस करण्यासाठी नागरी सेवा मंडळ स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

सामान्य राज्यसेवा गट-ब व वैद्यकीय अधिकारी गट-ब (वेतनस्तर एस-१६) संवर्गातील अधिका-यांच्या बदल्यासाठी नागरी सेवा मंडळ स्थापन करण्यात येत असून, नागरी सेवा मंडळाची रचना पुढीलप्रमाणे करण्यात येत आहे:-

| | | |
|---|---|---|
| १ | संचालक-१, आरोग्य सेवा आयुक्तालय,मुंबई | अध्यक्ष |
| २ | संचालक-२, आरोग्य सेवा आयुक्तालय,पुणे | सदस्य |
| ३ | सहसंचालक, (अर्थ व प्रशासन) , आरोग्य सेवा आयुक्तालय,मुंबई | सदस्य |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०५२२१७५४२३८९१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MAHESH MADHUKAR LAD

Digitally signed by MAHESH MADHUKAR LAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=25beab36016c9d18b34e813ce2c51ae3ba862f5ee940326a80ef8dfa067b2f3b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2B0B7B24B48EA4D47E171EF81F64A0D535EBB08400DA6060265D4872BADAEACA, cn=MAHESH MADHUKAR LAD
Date: 2023.06.09 19:07:10 +05'30'

**(महेश म.लाड)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. राज्यपाल यांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य
४. मा. मंत्री (सा.आ.) यांचे खाजगी सचिव
५. अपर मुख्य सचिव (सा.आ.) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक आरोग्य विभाग,मंत्रालय, मुंबई

६. सचिव (२) (सा.आ.) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय,मुंबई
७. आयुक्त, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई
८. संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई
९. सहसंचालक/उपसंचालक आरोग्य सेवा (सर्व)
१०.सर्व जिल्हा शल्यचिकित्सक/जिल्हा आरोग्य अधिकारी
११.सर्व सह सचिव/उपसचिव सार्वजनिक आरोगय विभाग,मंत्रालय,मुंबई
१२.अवर सचिव (कार्यासन-१२) सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय,मुंबई
१३.निवडनस्ती, सार्वजनिक आरोग्य विभाग (सेवा-१).